पंचवार्षिक योजनांतर्गत योजना सन २००७-२०१२ आणि
वार्षिक योजनांतर्गत योजना २००९-२०१०
कला अभ्यासक्रमाच्या क्रमिक पुस्तकांचे प्रकाशन व
दुर्मिळ साहित्यांचे जपणूक व संवर्धन करणे.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः- एडिआर-२००९/(९४/०९) तांशि-६
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २५ ऑगस्ट, २००९.

वाचा:- संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. डिओओ/२००९/दोन/१२५६
दिनांक १२ मे, २००९ चे पत्र

**प्रस्तावना**:- राज्यामध्ये कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील एकूण ३१ अनुदानित व १३७ विना अनुदानित पदविका अभ्यासक्रम संस्था कार्यरत आहे. कला संचालनालयामार्फत पदविका अभ्यासक्रम तयार केला जातो. पेंटिंग, उपयोजित कला, वस्त्रकला , शिल्पकला, सिरेमिक पॉटरी, मेटल , इंटिरियर डेकोरेशन, अे.टी.डी , ए.एम. , कला शिक्षक पदविका हे अभ्यासक्रम सन १९८५ पासून राबविले जात आहे. सध्याच्या आधुनिक व बदलत्या काळानुसार त्यात सुधारणा करुन संदर्भासाठी सुधारित पुस्तकांची छपाई व प्रकाशन करणे आवश्यक आहे. तसेच सर ज.जी. कला महाविद्यालयातून अनेक प्रथितयश कलाकार शिक्षित होऊन बाहेर पडले आहेत. या कलाकारांच्या दुर्मिळ व मौल्यवान कलाकृतीची जपणूक व संवर्धन होणे आवश्यक आहे. त्याकरिता निधीची तरतूद करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**:- कला संचालनालयाचे कला अभ्यासक्रमाच्या क्रमिक पुस्तकांचे प्रकाशन व दुर्मिळ साहित्यांचे व कलाकृतींचे जपणूक व संवर्धन करण्यासाठी चालू आर्थिक वर्षात रु. ५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदरचा निधी त्याच प्रयोजनासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षात खर्ची घालण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुत आदेश हे नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२८/१४७१, दि.२८.५.२००९ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ/३५५/व्यय-५, दि.२९.५.२००९ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

२. उपरोक्त निधी "२२०५, कला व संस्कृती, १०१ ललित कला शिक्षण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१)(०३) क्रमिक पुस्तके/ कला साहित्य प्रकाशित करणे आणि दुर्मिळ चित्रांचे संस्करण , संरक्षण व पुन:स्थापन" (२२०५ ३१२५) या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र.२००९०८१२१५५३०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अ. गो. खडपकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

कृ.मा.प.

प्रत,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट १/२, मुंबई/नागपूर.

महालेखापाल ( लेखा परीक्षा ) , महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.

वित्त विभाग,

नियोजन विभाग

अवर सचिव, (साशि-१ ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग

निवड नस्ती - तांशि-६

C:\dos\G.R\ADR-२५-०१- New Item Gr..doc